डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ,
दापोली यांना ०४- निवृत्तीवेतन विषयक खर्च
अंतर्गत अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : कोकृवि-१११३/प्र.क्र.७७/७-अे,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
दिनांक : १९ नोव्हेंबर, २०२०.

वाचा :- १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : सेनिवे - २०१९/प्र.क्र.५८/सेवा-४, दि.०१ एप्रिल, २०१९.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक : अर्थसं २०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३,दि.१६ एप्रिल, २०२०.
३) डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, यांचे क्रमाक : अ.शा./पत्र क्र/ डॉबासाकोकृवि/कुलगुरु/२८/३९३५/२०२०, दि.१३ जुलै, २०२०.

**प्रस्तावना :-**

वित्त विभागाच्या दि.०१ एप्रिल, २०१९ अन्वये राज्यातील कृषि विद्यापीठांतर्गत जानेवारी-२०१६ पूर्वी सेवानिवृत्त झालेल्या अधिकारी/कर्मचारी यांना सातवा वेतन आयोग लागू करण्यात आलेला आहे. त्यानुसार डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत सेवानिवृत्तीधारकांना सातव्या वेतन आयोगानुसार देय असलेली थकबाकीची रक्कम (पहिला हप्ता) तसेच निवृत्तीवेतने अदा करण्याची बाब शासनाच्या विचाधीन होती.

**शासन निर्णय :-**

डॉ.बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली अंतर्गत सेवानिवृत्तीधारकांना सातव्या वेतन आयोगानुसार देय असलेली थकबाकीची रक्कम (पहिला हप्ता) तसेच निवृत्तीवेतने अदा करण्यासाठी सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षातील **मागणी क्र.डी-३, २४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण** या मुख्य लेखाशीर्षाखाली '०१-पीक संवर्धन', '०३-पशुसंवर्धन' व '०५-मत्स्यव्यवसाय' या उपशीर्षांतर्गत ०४-निवृत्तीवेतन विषयक खर्च या बाबींकरीता निम्ननमूद विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे रु.१५,५२,५०,०००/- (अक्षरी रुपये पंधरा कोटी बावन्न लक्ष पन्नास हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास व खर्चास शासन मंजुरी देण्यात येत आहे.

(रुपये हजारात)

| अ.क्र. | लेखाशीर्ष | वितरीत करावयाची रक्कम |
|---|---|---|
| १ | ०१-पीक संवर्धन, ०४-निवृत्तीवेतन विषयक खर्च (२४१५ ००३४) | १३,३४,४०.०० |
| २ | ०३-पशु संवर्धन, ०४-निवृत्तीवेतन विषयक खर्च (२४१५ ०१७९) | ७१,९५.०० |
| ३ | ०५-मत्स्य व्यवसाय, ०४-निवृत्तीवेतन विषयक खर्च (२४१५ ०२४१) | १,४६,१५.०० |
| | एकूण - | १५,५२,५०.०० |

**अटी व शर्ती :-**

१) वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

२) सन २०२०-२०२१ मधील अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. यापुढे अनुदानाची मागणी सादर करताना, पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

३) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

२. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली यांनी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्रस्तुत प्रकरणी नियमानुसार आवश्यक कार्यवाही करावी.

४. सदरचे आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२, १४३, १४४ व १६२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार व शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक: अर्थसं २०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३,दि. १६/०४/२०२० च्या परिपत्रकातील सर्व अटी व शर्तीनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र.२१९/२०२०/व्यय-१, दि.२०/१०/२०२० नुसार प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२०१११९११५४१७९४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Varsha Mangesh Meher
Date: 2020.11.19 11:59:42 +05'30'

**( वर्षा मेहेर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. सदस्य सचिव तथा महासंचालक / सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक/ संचालक (शिक्षण), डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली,
३. उपविभागीय कृषि अधिकारी, दापोली,
४. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, रत्नागिरी / उपकोषागार अधिकारी, दापोली, जिल्हा रत्नागिरी,
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
७. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
८. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
९. कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१०. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.